**गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ तसेच ऊसतोड कामगारांसाठी विविध कल्याणकारी सामाजिक सुरक्षा योजना, ऊसतोड कामगारांशी संबंधित विषय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडे हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग ,ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. असंका-११२०/प्र.क्र.२०/काम-७अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:-२४ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा:**- शासन निर्णय क्रमांक असंका-१११९/ प्र.क्र.११०/काम-७अ, दि.१३ सप्टेंबर, २०१९.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यामध्ये साखर उद्योग हा एक प्रमुख उद्योग असून सद्यस्थितीमध्ये राज्यात कार्यरत सुमारे १०१ सहकारी क्षेत्रातील व ८७ खाजगी क्षेत्रातील साखर कारखान्यांमध्ये अंदाजे ८ लाख ऊसतोड कामगार या क्षेत्रात काम करतात. बहुतांश उसतोड कामगार हे मराठवाडा विभागातील व विशेषत: बीड जिल्ह्यातील असून राज्यातील विविध जिल्ह्यांत स्थलांतरीत होऊन काम करतात. या ऊसतोड कामगारांचे व पर्यायाने त्यांच्या कुटुंबियांचे जीवन अस्थिर व अत्यंत हलाखीचे असल्यामुळे त्यांचे जीवन सुखकारक करुन त्यांचे राहणीमान उंचावून आयुष्य स्थिर व सुरक्षित करण्यासाठी ऊसतोडणी व्यवसायातील असंरक्षित ऊसतोड कामगारांना कायद्याच्या कक्षेत आणून त्यांना विविध कल्याणकारी योजनांचा लाभ देण्याकरीता उद्योग, ऊर्जा व कामगार विभागातून सदर विषय हाताळण्यात येत आहे. राज्यातील ऊसतोड कामगारांसाठी विविध कल्याणकारी व सामाजिक योजनांचा लाभ देण्यासाठी "**गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ**" उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्रमांक असंका-१११९/ प्र. क्र. ११० / काम-७अ दि. १३/९/२०१९ अन्वये स्थापन करण्यात आले आहे.

राज्यातील प्रमुख उद्योगांपैकी एक उद्योग असणाऱ्या साखर उद्योगाकरीता अंदाजे आठ लाख ऊसतोड कामगार काम करीत असतात. बहुतांश ऊसतोड कामगार हे मराठवाडा विभागातील व विशेषत: बीड जिल्ह्यातील आहेत. दरवर्षी होणाऱ्या स्थलांतरामुळे अनेक सामाजिक प्रश्न निर्माण झालेले आहेत. तसेच, ऊसतोड कामगारांच्या पाल्यांच्या शिक्षणावरदेखील याचा खूप मोठया प्रमाणावर परिणाम होत आहे. सद्यस्थितीत, सदर महामंडळाचे कामकाज कामगार विभागामार्फत पाहिले जात होते. मा.मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांनी त्यांच्या दिनांक १०.२.२०२० च्या पत्रान्वये त्यांनी महामंडळाचे कामकाज अधिक परिणामकारकरित्या होण्याकरीता सदर महामंडळाचे स्थलांतरण सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडे करण्याची कार्यवाही करावी अशी विनंती केली आहे.

सामाजिक न्याय विभागाकडे सामाजिक लाभांच्या योजनांकरीता मोठया प्रमाणावर निधी उपलब्ध असतो. त्यामुळे, मा.मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांनी विनंती केल्याप्रमाणे ऊसतोड महामंडळाद्वारे सामाजिक सुरक्षा व तत्सम विविध योजना राबविण्यासाठी सहजरित्या निधी उपलब्ध होईल असे या विभागाचे मत आहे.

**शासन निर्णयः-**

वरील विवेचन लक्षात घेवून शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, "गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ"व त्यासंदर्भातील उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील सर्व कागदपत्रे /नस्त्या सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडे हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. यापुढे, ऊसतोड कामगारांसाठी "गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ " सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत कार्यरत राहील तसेच महामंडळामार्फत भविष्यात राबवावयाच्या सर्व योजना व इतर कार्यक्रम त्या विभागामार्फत हाताळण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००२२४१७१८३८९८१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vasant Shinde

Digitally signed by Arun Vasant Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industries Energy & Labour Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, serialNumber=672d36cc7468aa812e66dbb4704ffeb120dd58831284824f4fbec2a6f6602199, cn=Arun Vasant Shinde
Date: 2020.02.25 10:58:31 +05'30'

**( अरुण व. शिंदे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र यांचे सचिव (पत्राने),
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
३) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, अ-६, मंत्रालयासमोर, नरीमन पॉईंट, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई,
६) मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) मा.सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य, विधान भवन, मुंबई,
८) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
९) अपर मुख्य सचिव,सामान्य प्रशासन विभाग (रचना व कार्य), मंत्रालय, मुंबई,
१०) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय यांचे स्वीय सहायक, मुंबई,
१४) कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
१५) विकास आयुक्त (असंघटीत कामगार), ६वा मजला, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, प्रशासकीय भवन,सेनापती बापट मार्ग, प्रभादेवी,मुंबई -४०००१३.
१६) सर्व सह/उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,

१७) सर्व सह कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
१८) सर्व कामगार उप आयुक्त, कामगार भवन, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
१९) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२०) सर्व अवर सचिव/कार्यासन अधिकारी, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१) निवड नस्ती /कार्यासन ७अ.